**राज्यातील सहकारी उपसा जलसिंचन संस्थांना सन २०१६-१७ मध्ये २५% अनुदान मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सीएसएल-१५१५/प्र.क्र.१२८/७-स,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- २२ नोव्हेंबर, २०१६.

वाचा:- १. शासन निर्णय क्रमांक: सीएसएल-१४९४/२८२२/प्र.क्र.१३३/७-स, दि.१९.११.१९९४.
२. शासन निर्णय क्रमांक: सीएसएल-१५१३/प्र.क्र.९२३/७-स, दि.२४.१२.२०१३
३. शासन निर्णय समक्रमांक दि. २८.२.२०१४.
४. शासन निर्णय क्रमांक : सीएसएल १५१३/ प्र.क्र.२६८/७-स, दि. ३१.३.२०१५.

प्रस्तावना:-

राज्यातील सहकारी उपसा जलसिंचन योजनांच्या प्रकल्प खर्चामध्ये गेल्या काही वर्षात सातत्याने वाढ होत असून, त्यामुळे अल्प व सिमांत शेतकरी सभासदच नव्हे तर मध्यम व मोठया शेतकऱ्यांना सुध्दा वाढता प्रकल्प खर्च करणे आर्थिकदृष्या अडचणीचे झाले आहे. शासनाच्या खर्चाने ज्या लहान मोठया पाटबंधारे योजना हाती घेण्यात येतात त्या योजनांच्या लाभक्षेत्रातील शेतकऱ्यांना कोणत्याही खर्चाविना पाण्याची सोय उपलब्ध होते. या उलट इतर भागातील शेतकऱ्यांनी स्वत:च उपसा जलसिंचनाची व्यवस्था करण्याचे ठरविल्यास त्यांच्या योजनांचा संपूर्ण खर्च त्यांना स्वत:च करावा लागतो. त्यामुळे सहकारी उपसा जलसिंचन योजनांच्या लाभधारक सभासदांवरील खर्चाचा बोजा कमी करुन तो काही प्रमाणात शासनाकडून उचलला जावा, या दृष्टीकोनातून उपरोक्त शासन निर्णय, दिनांक १९.११.१९९४ अन्वये सदर शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट “अ” मधील अटींच्या अधिन राहून सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात सहकारी उपसा जलसिंचन योजनांना अर्थसहाय्य देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

**१.** सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडून सदर शासन निर्णयानुसार अनुदान मंजूरीसाठी प्राप्त झालेल्या प्रस्तावापैकी सन २०१५-१६ या वित्तीय वर्षासाठी ६ सहकारी उपसा जलसिंचन संस्थांना रुपये १,०२,३१,६२५/-(रुपये एक कोटी दोन लाख एकतीस हजार सहाशे पंचवीस फक्त) इतके अनुदान मंजूर करुन वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**२.** सोबतच्या परिशिष्ट **-अ**॰ मधील ५ सहकारी उपसा जलसिंचन संस्थांना देण्यात आलेली मंजूरी, प्रस्तावासोबत सहकार आयुक्त, पुणे यांच्याकडून सादर करण्यात आलेल्या माहितीच्या आधारे देण्यात आलेली असल्याने सादर केलेल्या कागदपत्रात **तसेच माहितीत काही विसंगती आढळून आल्यास सदरहु रक्कम संबंधीत संस्थांकडून व्याजासह एकरकमी वसूल केली जाईल या अटींच्या अधिन राहील.**

**३.** वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याचा रकमेचा धनादेश, ज्या बँक/वित्तीय संस्थांकडून सहकारी उपसा जलसिंचन संस्थेने प्रकल्प खर्चाकरीता कर्ज घेतलेले असेल, त्या बँकेच्या / वित्तीय संस्थेच्या व्यवस्थापक/प्रबंधक यांचे नावे काढण्यात यावा. तसेच सदर धनादेश प्राप्त झाल्यानंतर बँकेने/वित्तीय संस्थेने त्यांना धनादेशाद्वारे प्राप्त झालेली अर्थसहाय्याची रक्कम संबंधीत सहकारी उपसा जलसिंचन संस्थेकडून त्यांना येणे असलेल्या कर्जाच्या रकमेपोटी समायोजित करावी.

**४.** सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात या योजनेकरीता उपलब्ध तरतुदीमधून रुपये १,०२,३१,६२५/-(रुपये एक कोटी दोन लाख एकतीस हजार सहाशे पंचवीस फक्त) इतकी रक्कम परिशिष्ट -अ॰ प्रमाणे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे कार्यालय स्तरावर बी.डी.एस. वर उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे. या योजनेवरील रक्कम खर्ची घालण्याकरीता सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

**५. निधी वितरीत केल्यानंतर किंवा त्यापूर्वी प्रत्यक्ष उपसा योजनेची पहाणी करुन निधीचा योग्य वापर झाल्याची खात्री करावी. तसेच लाभार्थी शेतकऱ्यांची पण प्रत्यक्ष भेट घ्यावी. त्यामध्ये काही चुकीचे होऊ नये याची दक्षता घ्यावी.**

**६. वरीलप्रमाणे कार्यवाही न झाल्यास संस्थेबरोबर तपासणी अधिकाऱ्यावर देखील जबाबदारी निश्चित करण्यात यावी.**

**७.** शासनाच्या वतीने सदर रक्कम कोषागारातून काढून संबंधीत बँक/वित्तीय संस्थेस धनादेशाद्वारे अदा करण्यास लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांना आहरणाचे व संवितरणाचे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. त्यांनी सदरचा खर्च सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील रुपये १,०२,३१,६२५/-(रुपये एक कोटी दोन लाख एकतीस हजार सहाशे पंचवीस फक्त) तरतुदीतून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागवावा. लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वरीलप्रमाणे काढलेली रक्कम संबंधीत बँकेस/वित्तीय संस्थेस त्यांच्या कर्जाच्या रकमेपोटी अदा केल्यानंतर त्याबाबतचा पूर्तता अहवाल १५ दिवसांत शासनास सादर करावा.

**८. <u>शासन निर्णय क्रमांक सीएसएल-१४९४/२८२२/प्र.क्र.१३३/७-स, दिनांक १९.११.१९९४ व २४/१२/२०१३ आणि २८/२/२०१४ सोबतच्या परिशिष्ट "अ" मधील अटींची तंतोतंत पुर्तता झाल्यानंतरच सहकार आयुक्त यांनी संबंधीत संस्थाना अनुदानाचे वाटप करावे.</u>**

**९.** या करीता होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

"मागणी क्रमांक व्ही -२,

२४२५, सहकार

१०८, इतर सहकारी संस्थांना सहाय्य

(पाच) इतर संकिर्ण सहकारी संस्था

पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (राज्य योजनांतर्गत योजना)

(०५) (०२) उपसा जलसिंचन योजनांना अर्थसहाय्य (२४२५ १२६१)

३३, अर्थसहाय्य,

**१०.** सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा क्रमांक:- अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७.४.२०१५ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**११.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६११२३१११२०००४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co- Operation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2016.11.23 11:14:05 +05'30'

**( रमेश शिंगटे )**

विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई
२. महालेखापाल, लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र -२, नागपूर
३. महालेखापाल, लेखा परिक्षण, महाराष्ट्र -१, मुंबई,
४. महालेखापाल, लेखा परिक्षण, महाराष्ट्र -२, नागपूर,
५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर, अहमदनगर, सांगली व बुलढाणा
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे ,कोल्हापूर, अहमदनगर, सांगली व बुलढाणा
८. कार्यासन अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२) मंत्रालय, मुंबई
९. कार्यासन अधिकारी, का. १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.कार्यासन अधिकारी (१६-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
११.कार्यासन अधिकारी (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई
१२.निवड नस्ती.

## परिशिष्ट “अ”

**शासन निर्णय क्रमांक सीएसएल- १५१५/प्र.क्र. १२८/७-स, दि. २२ नोव्हेंबर, २०१६ सोबतचे सहपत्र सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात अनुदान मंजुरीसाठी पात्र ठरलेल्या सहकारी उपसा जलसिंचन संस्थांची यादी.**

| अ. क्र. | संस्थेचे नाव | अनुदानाची रक्कम |
|---|---|---|
| १. | पंचरत्न सहकारी पाणी पुरवठा योजना कुरुल ता. मोहोळ, जि. सोलापूर | रु.३४,६२,५००/- |
| २. | श्री .अदृश्य काडसिध्देश्वर सहकारी पाणी पुरवठा संस्था मर्या .जैताळ, ता .करवीर, जि . कोल्हापूर. | रु. ३२,६२,१२३/- (रु. २१,२८,३८६/- इतके अनुदान दि.३१/३/२०१५ च्या शासन निर्णयान्वये अदा करण्यात आले. उर्वरित रक्कम रु. ३२,६२,१२३/- इतके अनुदान वितरीत करावयाचे आहे.) |
| ३. | अन्नासाहेब खुटाळे सहकारी पाणी पुरवठा संस्था मर्या.खुटाळवाडी ता .शाहुवाडी जि .कोल्हापूर | ५,२२,५००/- |
| ४. | केदारलिंग सहकारी सहकारी पाणी पुरवठा संस्था मर्या .केळोशी खुर्द पैकी खामकरवाडी ता . राधानगरी जि .कोल्हापूर | रु.-/२०,६८,०७७ (अनुज्ञेय अनुदान निधी रु.२२,२६,८२५/- मात्र निधी उपलब्धतेअभावी रु.२०,६८,०७७/- इतके अनुदान वितरीत करण्यात येईल.) |
| ५. | उपसा जलसिंचन बचतगट सहकारी संस्था मर्या. चार्वदा, ता. मोताळा, जि. बुलडाणा | ९,१६,४२५/- |
| | **एकूण** | **रु. १,०२,३१,६२५/-** |

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co- Operation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2016.11.23 11:14:23 +05'30'

( रमेश शिंगटे )
विशेष कार्य अधिकारी, महाराष्ट्र शासन